**उद्योग संचालनालयातील वयाच्या ५०/५५ व्या वर्ष किंवा अर्हताकारी सेवेच्या ३० वर्ष होतांना अधिकाऱ्यांचे पुनर्विलोकन करुन मुदतपुर्व सेवानिवृत्त करण्यासाठी विभागीय पुनर्विलोकन समिती / अभिवेदन समिती गठीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : ईएसटी-२०१९/४०९/प्र.क्र.५९/उद्योग-३**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : ०३ मार्च, २०२०

संदर्भ :- १. सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक एलपीएल- २०१७/प्र.क्र.२१/का.पंधरा, दि.१० जून, २०१९

२. उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाचा शासन निर्णय क्रमांक आयएसटी-२००९/ प्र.क्र.४५२/ उद्योग-३, दि.२३.९.२००९

**प्रस्तावना :**

महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतन) नियम, १९८२ मधील तरतुदप्रमाणे सार्वजनिक हितास्तव अकार्यक्षम व संशयास्पद सचोटी असलेल्या अधिकारी / कर्मचाऱ्यांना वयाच्या ५०/५५ वर्षी अथवा ३० वर्षाच्या अर्हताकारी सेवा यापैकी जे अगोदर घडेल त्यावेळी त्यांची सेवा पुनर्विलोकन करुन अपात्र अधिकारी / कर्मचारी यांना शासन सेवेतून मुदतपूर्व सेवानिवृत्त करावे असे शासनाचे धोरण आहे. शासनाच्या सदर धोरणास अनुसरुन यासंदर्भात यापुर्वी निर्गमित केलेली विविध शासन निर्णय, परिपत्रके इ. अधिक्रमित करुन सामान्य प्रशासन विभागाने पुनर्विलोकनासंबंधात करावयाच्या कार्यवाहीबाबत संदर्भ क्रमांक १ अन्वये एकत्रित शासन निर्णय निर्गमित केला आहे. सदर शासन निर्णयास अनुसरुन या विभागाच्या अधिपत्याखालील उद्योग संचालनालयातील गट-अ व गट-ब संवर्गातील अधिकाऱ्यांचे वयाच्या ५०/५५ व्या वर्षी किंवा ३० वर्षाची अर्हताकारी सेवा पुर्ण होतांना पुनर्विलोकन करण्यासाठी पुनर्विलोकन समिती गठीत करण्याची तसेच पुनर्विलोकन समितीने सेवा पुढे चालू ठेवण्यास अपात्र ठरविलेल्या अधिकारी/कर्मचाऱ्यांबाबत मुदतपूर्व सेवानिवृत्तीच्या निर्णयाविरुध्दच्या अभिवेदनावर विचार करण्यासाठी अभिवेदन समिती गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाचा संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णय अधिक्रमित करुन सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयातील तरतुदी विचारात घेऊन या विभागाच्या अधिनस्त असलेल्या उद्योग संचालनालयातील गट-अ व गट-ब संवर्गातील अधिकारी शासन सेवेत राहण्यास पात्र आहेत किंवा कसे याबाबीचे पुनर्विलोकन करण्यासाठी खालीलप्रमाणे विभागीय पुनर्विलोकन समिती गठीत करण्यात येत आहे.

| | | |
|---|---|---|
| सचिव/प्रधान सचिव/ अपर मुख्य सचिव (उद्योग) | : | अध्यक्ष |
| उ.स./स.स. (उद्योग-३) | : | सदस्य |
| उद्योग विभागातील ज्येष्ठत्तम उ.स./स.स. | : | सदस्य |
| क.अ./अ.स. (उद्योग- ३) | : | सचिव |

२. विभागीय पुनर्विलोकन समितीने सेवा पुनर्विलोकनानंतर पुढे चालू ठेवण्यास अपात्र ठरलेल्या व त्यानुसार संबंधीत अधिकाऱ्यास नोटीस बजावल्यानंतर त्या अधिकाऱ्याने सादर केलेल्या अभिवेदनावर विचार करण्याकरीता सहाव्या वेतन आयोगानुसार ग्रेड वेतन ७६०० व त्या पेक्षा अधिक परंतू १०,००० पेक्षा कमी ग्रेड वेतन असलेल्या गट अ (राजपत्रित) अधिकाऱ्यांसाठी सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भाधीन शासन निर्णयातील परिच्छेद ३ अनुसार आस्थापना मंडळ क्रमांक २ हे अभिवेदन समिती कार्यरत असेल.

३. तथापि, गट-अ (सहाव्या वेतन आयोगानुसार ग्रेड वेतन ७६०० पेक्षा कमी) व गट-ब (राजपत्रित) अधिकारी यांच्या अभिवेदनावर विचार करण्यासाठी खालीलप्रमाणे अभिवेदन समिती गठीत करण्यात येत आहे.

| | | |
|---|---|---|
| सचिव/प्रधान सचिव/ अपर मुख्य सचिव (उद्योग) | : | अध्यक्ष |
| उद्योग विभागातील ज्येष्ठत्तम उप सचिव / सह सचिव | : | सदस्य |
| क.अ./अ.स (उद्योग-४) | : | सदस्य सचिव |

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००३०३१२१९५४८८१० असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

Namdeo Kondiba Bhosale

Digitally signed by Namdeo Kondiba Bhosale
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Industries Energy and Labour Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8db1ca2341132b954db9052b5ef3bd93e7410456a96fa70df7ff81c68231fcd3, serialNumber=8c6a286229ecc7982a08553f49d547ef64be25c7f26fc96324ece7cccbfeb8c5, cn=Namdeo Kondiba Bhosale
Date: 2020.03.03 12:22:35 +05'30'

**( डॉ. ना. कों. भोसले )**
शासनाचे उप सचिव

**प्रत-**

१) प्रधान सचिव (उद्योग), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई
२) विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मंत्रालयासमोर, मुंबई
३) सह सचिव (उद्योग), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई
४) अवर सचिव (उद्योग-४), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई
५) सामान्य प्रशासन विभाग (कार्यासन-१२, १३ व १५), मंत्रालय, मुंबई
६) निवडनस्ती (उद्योग-३).